मत्स्यदुष्काळाबाबत प्रधान सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली पुनर्विलोकन समिती तर आयुक्त (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखाली कार्यकारी समिती गठित करणेबाबत..

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१९२०/प्र.क्र. ७२/पदुम-१४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ४ मे, २०२२

वाचा - समक्रमांकाचा शासन निर्णय दि. ०९ डिसेंबर, २०२०

प्रस्तावना -

चक्रीवादळ, कोरोनाचा प्रादुर्भाव रोखण्याकरिता केलेला लॉकडाऊन व पावसाळी मासेमारी बंदीमुळे कोकणातील मच्छिमारांना मासेमारीकरिता अल्प कालावधी मिळाल्यामुळे त्यांच्या उपजिविकेवर परिणाम झाले. मच्छिमारास झालेले आर्थिक नुकसानापोटी नुकसान भरपाई तसेच मत्स्यदुष्काळ जाहीर करावा अशी मागणी विविध मच्छिमार संघटना व लोकप्रतिनिधी यांच्या कडुन प्राप्त झाली आहे व या प्रकरणी सन २०२० च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात मा मंत्री बंदरे, वस्त्रोद्योग व मत्स्यव्यवसाय यांनी दि. २४.०२.२०२० रोजी मा. विधानमंडळात प्रधान सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्याचे आश्वासन दिलेले आहे. त्यानुषंगाने मत्स्यदुष्काळाबाबत प्रधान सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यास वाचा येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर समितीची कार्यकक्षा ही संपुर्णपणे तांत्रिक बाबींशी निगडीत असल्यामुळे प्रधान सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखालील समितीचे पुनर्गठण करुन पुनर्विलोकन समिती स्थापन करण्याबाबत व आयुक्त (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखाली कार्यकारी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कोकणातील किनारी भागात चक्रीवादळामुळे निर्माण झालेल्या मत्स्यदुष्काळाच्या संदर्भात प्रधान सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्याबाबतचा दि. ०९ डिसेंबर, २०२० रोजीचा शासन निर्णय अधिक्रमीत करुन खालीलप्रमाणे समिती गठित करण्यास शासन मान्यता देत आहे.

अ) प्रधान सचिव (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखाली पुनर्विलोकन समिती -

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव, (पदुम), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २. | आयुक्त (मत्स्यव्यवसाय), महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ३. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| ४. | सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

आयुक्त (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने सादर केलेल्या अहवालावर योग्य ती कार्यवाही करणे.

आ) आयुक्त (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समिती -

| | | |
|---|---|---|
| १. | आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| **शासकीय सदस्य** | | |
| २. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| ३. | वरिष्ठ वैज्ञानिक, केंद्रीय सागरी मत्स्यकी अनुसंधान संस्था, मुंबई | सदस्य |
| ४ | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ५ | सागरी उत्पादने निर्यात प्राधिकरण विभागाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | वैज्ञानिक, केंद्रीय मत्स्यकी शिक्षण अनुसंधान संस्था, मुंबई. | सदस्य |
| ७ | सहयोगी अधिष्ठता, शासकीय मत्स्य महाविद्यालय, रत्नागिरी | सदस्य |
| ८ | फिशरी सर्व्हे ऑफ इंडिया, मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| १० | प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, कोकण विभाग, मुंबई | सदस्य सचिव |
| **अशासकीय सदस्य** | | |
| ११ | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मच्छिमार सहकारी संघ लि. | सदस्य |
| १२ | अध्यक्ष, मुंबई राज्य मच्छिमार सहकारी संघ लि. | सदस्य |
| १३ | अध्यक्ष, ठाणे राज्य मच्छिमार सहकारी संघ लि. | सदस्य |
| १४ | अध्यक्ष, रायगड राज्य मच्छिमार सहकारी संघ लि. | सदस्य |
| १५ | अध्यक्ष, रत्नागिरी राज्य मच्छिमार सहकारी संघ लि. | सदस्य |
| १६ | अध्यक्ष, सिंधुदुर्ग राज्य मच्छिमार सहकारी संघ लि. | सदस्य |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

अ) सन २०१९-२० या वर्षामध्ये राज्याच्या सागरी किनारपट्टीवर कमी झालेल्या मत्स्योत्पादनाचा मासेमारी पद्धती**च्या** प्रकारानुसार यांत्रिक व बिगर यांत्रिक मासेमारी नौकांच्या सहाय्याने पकडलेल्या मासळीच्या मत्स्योत्पादनाच्या आकडेवारीवरून सखोल अभ्यास करुन राज्याच्या किनारपट्टीवर मत्स्यदुष्काळ परिस्थिती होती किंवा कसे याबाबतचा अभ्यास करुन करावयाच्या सुधारणांबाबत शासनास शिफारस करेल.

आ) राज्याचा मत्स्यव्यवसाय विभाग व केंद्रीय सागरी मत्स्यकी अनुसंधान संस्था, कोचीन यांचे मार्फत सागरी मत्स्योत्पादन संकलीत करण्याच्या पद्धतीचा अभ्यास करुन राज्यात सर्वसमावेशक संयुक्तीक मत्स्योत्पादन संकलित करण्याची पद्धत अंमलात आणता येईल किंवा कसे याचा अभ्यास करुन शासनास शिफारस करेल.

इ) नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित होणाऱ्या आपादग्रस्त व्यक्तींना द्यावयाच्या मदतीचे दर व निकषांमध्ये केंद्र शासनाच्या नैसर्गिक आपत्ती (SRDF/NDRF) च्या निकषांच्या धर्तीवर सागरी मच्छिमारांना उपयुक्त ठरतील अशा मुदतीचे दर व निकषांचा अभ्यास करुन केंद्र शासन (SRDF/NDRF) कडे शिफारस करण्यासाठी सुधारणा सुचवेल.

ई) (SRDF/NDRF) च्या नुकसान भरपाई अंतर्गत ज्या बाबींचा समावेश नाही. त्याबाबींची NDRF कडून मान्यता होईपर्यंत राज्य सरकाराच्या वतीने नुकसान भरपाईसाठी मदतीची योजना सुचविणे.

उ) महाराष्ट्र राज्याच्या सागरी किनारपट्टीवर मत्स्योत्पादन कमी होण्याच्या कारनाचा शोध घेऊन शाश्वत सागरी मासेमारीसाठी उपाय योजना सुचविणे.

ऊ) प्रधान सचिव (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखालील समितीस अहवाल सादर करणे.

समितीचे अध्यक्ष व सदस्य यांना मानधन, प्रवास भत्ता व तदनुषंगिक भत्ते वित्त विभागाच्या विहित धोरणानुसार अनुज्ञेय राहतील. प्रस्तुत बाबीवर होणारा खर्च आयुक्त (मत्स्यव्यवसाय) कार्यालयाच्या कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षामधून भागविण्यात यावा. याबाबतची कार्यवाही आयुक्त (मत्स्यव्यवसाय) कार्यालयामार्फत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५०५१४४९२०५८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrinivas Jagannath Shastri

Digitally signed by Shrinivas Jagannath Shastri
DN: c=IN, o=Personal, title=2388, pseudonym=ca8d31b3edf9920fda8c1d0f5f135a08db96d9d516052454832375d63a281822, postalCode=410210, st=Maharashtra, serialNumber=c02f19ac7e7ab3a50d817c95cf483e33229cf0cbb03283b175900630f81d2337, cn=Shrinivas Jagannath Shastri
Date: 2022.05.05 14:50:05 +05'30'

**(श्रीनिवास शास्त्री)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)

४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
५. प्रधान सचिव (पदुम), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. संचालक, केंद्रीय सागरी मत्स्यकी अनुसंधान संस्था, मुंबई.
७. केंद्रीय मत्स्यकी शिक्षण अनुसंधान संस्था, मुंबई.
८. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
९. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.अधिष्ठाता, शासकीय मत्स्य महाविद्यालय, रत्नागिरी.
११.सह आयुक्त (सागरी), मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२.प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, कोकण विभाग, मुंबई.
१३.सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, पालघर/ठाणे/मुंबई शहर/मुंबई उपनगर/ रायगड/ रत्नागिरी/सिंधुदुर्ग.
१४. महालेखापाल (लेखापरीक्षक/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१५.निवडनस्ती.